**अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, (उ.सं.), नागपूर यांचे अधिपत्याखालील द्वार निर्मिती व उभारणी विभाग क्र.१ अमरावती अंतर्गत कार्यरत द्वार उभारणी व दुरुस्ती उपविभाग क्र.२, देऊळगांवराजा हे कार्यालय खामगांव येथे फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.आढावा-२०१०/(प्र.क्र.२३१/२०१०)/आ (प्रशि)
जलसंपदा विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- १९ मार्च, २०११

**वाचा** :- १) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.मुअयां/आस्था-६/स्थलांतर/२९७६/२०१०, दि.१६/८/२०१०.
२) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ (उ.सं.) नागपूर यांचे पत्र क्र.यांमंनाग/आ-२/४८७०/२०१०, दि.८/११/२०१०.

**प्रस्तावनाः-**

देऊळगांव राजा येथे कार्यरत असलेले द्वार उभारणी व दुरुस्ती उपविभाग क्र.२ हे कार्यालय, त्या उपविभागाच्या अधिनस्त देखभाल व दुरुस्तीसाठी येत असलेल्या बहुतांशी प्रकल्पांपासून खामगाव पासून जास्त अंतरावर येत असल्याने, आपत्कालीन परिस्थितीत प्रादेशिक कर्मशाळा, अकोला येथून साहित्य प्राप्त करुन घेण्यासाठी तसेच नियंत्रण ठेवण्यासाठी गैरसोयीचे ठरत होते. यास्तव, हा उपविभाग देऊळगांवराजा येथून खामगांव येथे स्थलांतरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांचे अधिनस्त अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, (उ.सं.), नागपूर यांचे अधिपत्याखालील द्वार निर्मिती व उभारणी विभाग क्र.१ अमरावती विभागांतर्गत कार्यरत द्वार उभारणी व दुरुस्ती उपविभाग क्र.२, देऊळगांवराजा हे उपविभागीय कार्यालय तेथील उपलब्ध पदांसह फिरवाफिरवीने द्वार उभारणी व दुरुस्ती उपविभाग क्र.२, खामगांव या नावांने खामगांव, ता.खामगांव, जि.बुलढाणा येथे स्थलांतरित करण्याबाबत या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

i) उपविभागाचे कार्यालय शासकीय जागेतच ठेवावे, त्यासाठी बांधकामाचा वेगळयाने खर्च करु नये.

ii) सध्याच्या कार्यरत उपविभागातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा.

२. वरीलप्रमाणे स्थलांतर होणारे उपविभागीय कार्यालय दिनांक १ मे, २०११ पासून कार्यान्वित होईल. यादृष्टीने मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही दिनांक ३० एप्रिल, २०११ पूर्वी करावी व सदरचा उपविभाग **दिनांक १ मे, २०११** पासून नवीन ठिकाणी कार्यान्वित करावे.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदींनुसार उपरोक्त उपविभागीय कार्यालयांच्या उप अभियंता संवर्गातील अधिकायांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्र.आय-५, मुख्य लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ००१ संचालन व प्रशासन, (०१) आस्थापना (लाभक्षेत्र विकास) (०१)(१४) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ (उ.सं.), नागपूर (४७०१ ६८६५)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

५. हा शासन निर्णय क्र.वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२ मधील तरतूदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०३१९१४१२२६००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

मं.र.कर्णिक

**( मं.र.कर्णिक )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (कृ.खो.) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल १/२ महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व संबंधित अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ/निवडनस्ती धारिका.